**इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजना या योजनेकरिता केंद्र शासनाकडून सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता प्राप्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : शिवृत्ती २०१८/प्र.क्र.१३८/शिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १३ मार्च, २०२०

**संदर्भ** :-१) केंद्र शासनाचे क्र. १२०१३/१७/२०१८-BC-I, दि.३० ऑगस्ट, २०१९ चे पत्र.
२) शासन ज्ञापन क्रमांक इमाव २०१९/प्र.क्र.८६/शिक्षण, दि. १५ ऑक्टोंबर,२०१९
३) केंद्र शासनाचे क्र. ११०१४/२८/२०१९-BC-I, दि.१३ फेब्रुवारी, २०२० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्यातील इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना केंद्र पुरस्कृत मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेतर्गंत केंद्र शासनाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता पहिल्या हप्त्याकरिता संदर्भ क्र. १ येथे नमूद पत्रान्वये राज्य शासनास रु. ८८,५७,५०,०००/- (अक्षरी अठ्ठयाऐंशी कोटी सत्तावन्न लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरीत केला. सदर निधी या विभागाच्या शासन ज्ञापन क्र. इमाव २०१९/प्र.क्र.८६/शिक्षण, दि. १५ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आला. संदर्भ क्र. ३ येथे नमूद पत्रान्वये केंद्र शासनाकडून दुसऱ्या हप्त्याकरिता राज्य शासनास रु. २९,५२,५०,०००/- इतका निधी वितरीत केला. इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती (२२२५ ई ९९१) या अंतर्गत रु.१०० कोटीची तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु. ८८,५७,५०,०००/- इतका निधी पहिल्या हप्त्याकरिता वितरीत केला असून उर्वरीत रु. ११,४२,५०,०००/- इतका निधी वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे.

**ज्ञापन:-**

राज्यातील इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना केंद्र शासनाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेतर्गंत प्राप्त रु.११,४२,५०,०००/- (अक्षरी अकरा कोटी बेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त ) इतका निधी, मागणी क्र. झेड.जी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३ मागासवर्गीयांचे कल्याण, २७७, शिक्षण, ३४, शिष्यवृत्या/ विद्यावेतने, (०२) (१२) इतर मागास वर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (केंद्र पुरस्कृत १०० टक्के) कार्यक्रम (२२२५ ई ९९१) या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातूनच खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/ लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची दक्षता, संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, संचालनालय,पुणे यांची राहील.

०३. उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, संचालनालय,पुणे यांची राहील.

०४. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाच्या दि. ८.७.२०१९ व दि. २२.०१.२०२० च्या परिपत्रकामधील अटींची पुर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करण्यात यावा.

०५. सदर ज्ञापन वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. ७७/अर्थोपाय, दि. ०२/०३/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००३१३१२३३२२३५२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2020.03.13 12:36:08 +05'30'

( रविंद्र गुरव )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
४) खाजगी सचिव,मा.मंत्री, मृदा व जलसंधारण, राजशिष्टाचार, इतर मागास बहुजन कल्याण यांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई-३२
५) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, संचालनालय,पुणे
६) कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-२
७) निवडनस्ती (शिक्षण).